**वन विभागाची पुनर्रचना प्रशासकीय सुधारण्याच्या दृष्टीने मुख्य वनसंरक्षक व तद्नुषंगिक ३ (तीन) अस्थायी पदे दि.०१.०३.२०२२ ते दि.३१.०८.२०२२ पर्यंत पुढे चालू ठेवण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- एफएसटी-०२/२०/प्र.क्र.५६/फ-४**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक:- २१ मार्च, २०२२

वाचा :- १) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे क्र.कक्ष-३ /योजनेत्तर /प्र.क्र.२४ (२१-२२) /२९५, दि.१७.०२.२०२२.

२) शासन निर्णय क्र. एफएसटी-०२/२०/प्र.क्र.५६/फ-४, दि.२९.०९.२०२१

३) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.एमएफएस-२०१७/प्र.क्र.७७/फ-८, दि.१३.०९.२०१९.

४) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.पदनि -२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.२२.०२.२०२२

**शासन निर्णय :-**

वन विभागाची पुर्नरचना प्रशासकीय सुधारणेच्या दृष्टीने मुख्य वनसंरक्षक व तद्नुषंगिक पदे या योजनेत्तर योजनेखालील २ राजपत्रित व १ अराजपत्रित अशा एकूण ३ अस्थायी पदांना दि.०१.०९.२०२१ ते दि.२८.०२.२०२२ पर्यत संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये मुदतवाढ देण्यात आली होती.

२. सदर ३ अस्थायी पदांना दि.०१.०३.२०२२ ते दि.३१.०८.२०२२ पर्यंत मुदतवाढ देण्याचा प्रस्ताव प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.१ अन्वये शासनास सादर केला आहे.

३. उक्त परिस्थितीत प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर कार्यालयातील ३ अस्थायी पदांना (विवरणपत्र-अ प्रमाणे) दि.०१.०३.२०२२ ते दि.३१.०८.२०२२ पर्यत पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे. सदर मंजूरी वित्त विभाग शासन निर्णय क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.२२.०२.२०२२ मधील अटी व शर्तीच्या अधिन राहून देण्यात येत आहे. सदर मुदतवाढ महसूल व वन विभागाने संदर्भाधिन क्र.३ येथील शासन निर्णयान्वये निश्चित केलेल्या आकृतीबंधात या पदांचा समावेश आहे, या अटीच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

४. सदरहू पदावर होणारा खर्च हा खाली नमुद केलेल्या लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा व त्याखालील सन २०२२-२०२३ या वित्तीय वर्षात मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर या कार्यालयातील पदे**

| | |
|---|---|
| **प्रधान शीर्ष** | २४०६ वनीकरण व वन्यजीवन (योजनेत्तर) |
| **उपप्रधान शीर्ष** | ०१ वनीकरण |
| **गौणशीर्ष** | ००१ संचालन व प्रशासन |
| **उपशीर्ष** | ०१ संचालन व प्रशासन |
| | (०१) (एक) मुख्य वनसंरक्षक (वेतने) (२४०६ ००२२) |
| | (०२) |

५. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.पदनि २०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.२२.०२.२०२२ मधील तरतुदीनुसार विभागास असलेल्या प्राधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३२११८२३०८६७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ASHOK KASHINATH LAKKAS

Digitally signed by ASHOK KASHINATH LAKKAS
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=84261302514df14d17b0d46bb1422d22bfc355b1a840ece50f14894cd6b0da24, cn=ASHOK KASHINATH LAKKAS
Date: 2022.03.21 18:24:52 +05'30'

सोबत :- विवरणपत्र "अ"

**(अ.का.लक्कस)**
**कार्यासन अधिकारी, महसूल व वन विभाग**

प्रति-:

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य-१/२ मुंबई/नागपूर.
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) सर्व अप्पर प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
५) ब-१ कार्यासन, फ-२ कार्यासन, फ-८ कार्यासन, फ-७ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६) निवडनस्ती, फ-४ कार्यासन, महसूल व वनविभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

**शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्रमांक एफएसटी-०२/२०/प्र.क्र.५६/फ-४**

**दि. २१.०३.२०२२ सोबतचे विवरणपत्र**

**विवरणपत्र "अ"**

**प्रधान मुख्य वनसंरक्षक, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या कार्यालयातील सन २०२२-२३ या वर्षामध्ये दि.०१.०३.२०२२ ते दि.३१.०८.२०२२ पर्यत पुढे चालू ठेवलेली २ राजपत्रित व १ अराजपत्रित अशा ३ (तीन) अस्थायी पदांची यादी**

| अ.क्र. | पदांचे नाव | अस्थायी पदांची संख्या | स्तंभ क्रमांक ३ मधील पद/ पदे ज्या शासकीय आदेशान्वये निर्माण केली त्या आदेशाचा क्रमांक आणि दिनांक | स्तंभ क्र. ३ मधील पद/पदे २०२१-२०२२ यावर्षी ज्या शासकीय आदेशान्वये पुढे चालू ठेवली होती त्याचा क्रमांक आणि दिनांक |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | प्रधान मुख्य वनसंरक्षक, (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर | १ | शा.नि.म.व.व.वि.क्र.एफडीएम१०९५/ प्र.क्र.२८२/फ-२,दिनांक ३.५.१९९७ | शा.नि.क्र.एफएसटी ०२/२०/प्र.क्र.५६/फ-४ दिनांक :-२९.०९.२०२१ |
| २ | अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन-दुय्यम संवर्ग), महाराष्ट्र राज्य, नागपूर | १ | शा.नि.क्र.एफडीएम १०९५/ प्र.क्र.२८२/फ-२,दिनांक ३.५.१९९७ अ.प्र.मु.व.सं. (मा.स.व्य.व.प्र.) या पदाचे पदनामात बदल शासन अधिसूचना क्र. एएफओ-५००६/ १२७३/प्र.क्र.१८९ (भाग-१)/ एफ-७ दि.३१.८. २०१० अन्वये अ.प्र.मु.व.सं. (प्र.दु.सं.) असा करण्यात आलेला आहे. | शा.नि.क्र.एफएसटी ०२/२०/प्र.क्र.५६/फ-४ दिनांक :-२९.०९.२०२१ |
| ३ | लघुलेखक (उच्चश्रेणी) | १ | शा.नि.म.व.व.वि. क्र.एफडीएम१०९५/ प्र.क्र.२८२/फ-२,दिनांक ३.५.१९९७ | शा.नि.क्र.एफएसटी ०२/२०/प्र.क्र.५६/फ-४ दिनांक :-२९.०९.२०२१ |

******